सन २०१६-१७ करीता इको टुरि झम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांच्या विकास कामांकरिता निधी वितरण. (२४०६ २२९५)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१६/ प्र.क्र. ८७ /फ- ५**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- २१ मार्च, २०१७

**वाचा -** १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्रं. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३(१६-१७)/६३८/१६-१७,दि. ५.७.२०१६
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२०.४.२०१६.
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग, समक्रमांक दिनांक २२/७/२०१६

**प्रस्तावना -**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी संदर्भ क्र. १ दिनांक ९/३/२०१७ च्या पत्रान्वये राज्य योजनेंतर्गत निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (संरक्षित क्षेत्राबाहेर) या योजनेंतर्गत सन २०१६-१७ करिता यवतमाळ वनवृत्तातील श्री. महालक्ष्मी संस्थान देऊळगाव (वडसा) येथील ५० हेक्टर रोपवनास पाणी देण्यासाठी ड्रिप सिस्टीम बसविण्यासाठी रु. १८.४५ लक्ष चा प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावास मंजूरी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य योजना सन २०१६-१७ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (संरक्षित क्षेत्राबाहेर) (२४०६- २२९५) या योजनेंतर्गत श्री. महालक्ष्मी संस्थान देऊळगाव (वडसा) या पर्यटन स्थळास शासन निर्णय संदर्भ क्र.३, दि. २२/७/२०१६ अन्वये रु. १०२.६८ लक्ष निधी मंजूर करण्यात आला आहे. सदरहू निधीपैकी रोपवनातील रोपांना पाणी देणे, विशेष तांत्रिक कामे करणे तसेच रोपे खरेदी करुन उंच रोपे लावणे या कामांकरिता तरतुद करण्यात आलेल्या निधीपैकी रु. २२.९४ लक्ष निधी अखर्चित आहे. सदरहू अखर्चित निधीतून यवतमाळ वनवृत्तातील महालक्ष्मी संस्थान देऊळगाव (वडसा) येथील ५० हेक्टर रोपवनात ड्रिप सिस्टीम कार्यान्वित करण्यासाठी खाली नमुद केल्याप्रमाणे बाब निहाय निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रक्कम- लाखात)**

| अ.क्र. | कामाचे नाव | क्षेत्र | कामाची बाब | एकूण आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|
| १ | वृक्ष लागवड भाग-१ | २५.०० हेक्टर | सोलर पंप लावणे | ३.२५ |
| | | | ड्रिप सिस्टीम लावणे, भाग-१ | १.९५ |
| | | | ड्रिप सिस्टीम लावणे, भाग-२ | १.९२ |
| | | | ड्रिप सिस्टीम लावणे, भाग-३ | १.८८ |
| | | | एकूण | ९.०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | वृक्ष लागवड भाग-२ | २५.०० हेक्टर | सोलर पंप लावणे | ३.२५ |
| | | | ड्रिप सिस्टीम लावणे, भाग-१ | २.२६ |
| | | | ड्रिप सिस्टीम लावणे, भाग-२ | १.९६ |
| | | | ड्रिप सिस्टीम लावणे, भाग-३ | १.९८ |
| | | | एकूण | ९.४५ |
| | | | **एकूण** | **१८.४५** |

सदरहू शासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यत येत आहे.

१. उपरोक्त खर्च विहीत कार्यपद्धतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पूर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

२. प्रस्तावित सर्व कामांना सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी आहे याची खात्री करुनच कामे करावीत. तसेच सदरहू कामे करताना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशांची अवहेलना होणार नाही याची सुद्धा दक्षता घ्यावी.

३. शासन निर्णयात नमुद कामासाठी इतर स्त्रोतातुन निधी घेण्यात येणार नाही व कामाची द्विरुक्ती होणार नाही याचे प्रमाणपत्र उपयोगिता प्रमाणपत्रासोबत द्यावे त्याशिवाय पुढील निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घ्यावी.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२११३००१६०३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d44360342 6329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2017.03.21 13:03:04 +05'30'

**( अनिल धस )**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

(१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) , महाराष्ट्र राज्य, नागपूर
(२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , महाराष्ट्र राज्य, नागपूर
(३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर
(४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ.
(५) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
(६) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
(७) कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम)/, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(८) ब-१/फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग ,मंत्रालय, मुंबई.
(९) निवड नस्ती, फ-५.